**प्रधानमंत्री पीक विमा योजना सुधारीत मार्गदर्शक सूचनेनुसार ई-गव्हर्नंस प्रकल्पांतर्गत MRSAC ला रू.२.४२ कोटी इतकी रक्कम वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०१८/प्र.क्र.२५०/११ अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: १६ नोव्हेंबर, २०१८

वाचा -

१) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१८/प्र.क्र.५२/११-अे, दि.२४.५.२०१८
२) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१८/प्र.क्र.५२/११-अे, दि.१३.६.२०१८
३) महाराष्ट्र सुदुर संवेदन उपयोजन केंद्र कार्यालयाचे पत्र क्र. MRSAC/Agri-Tech/c १७६/२०१८-१९, दि.०५.११.२०१८

**प्रस्तावना :-**

राज्यात सद्य:स्थितीत खरीप व रब्बी हंगामात विविध पिकांची लागवड करून उत्पादन घेण्यात येते. सदरच्या पिकांना होणा-या निरनिराळया प्रादुर्भाव व आपत्तीपासून संरक्षण देण्याकरीता केंद्र व राज्य शासनाने प्रधानमंत्री फसल विमा योजना कार्यान्वित केली आहे. सदर योजनेंतर्गत शेतक-यांकडून घेण्यात येणा-या पिकांखालील क्षेत्रावरील पिकांना विमा संरक्षण देण्यात येते. सद्य:स्थितीत नजर अंदाजानुसार पिकाखालील पेरणी क्षेत्र निश्चित करण्यात येते. तसेच शेतक-यांकडून देखील अनेक वेळा पेरणी क्षेत्रापेक्षा जास्त क्षेत्राचा विमा काढण्यासाठी नोंद केली जाते. त्यामुळे अतिरीक्त विमा हफ्त्याचा नाहक भार शासनावर मोठया प्रमाणात येतो. तसेच पारंपारिक पध्दतीने पिक कापणी प्रयोगांच्या आधारे विमा क्षेत्रातील पिक उत्पादकता निश्चित करण्याच्या प्रक्रीयेतही पारदर्शकतेचा काही प्रमाणात अभाव असल्याने त्याबाबत अनेक तक्रारी प्राप्त होत असतात. त्याशिवाय सदर योजनेकरीता राज्य व केंद्र शासनाकडून मोठया प्रमाणात निधीदेखील उपलब्ध करून खर्च करण्यात येतो. सदरचे विमा संरक्षण हे राज्यातील पिकनिहाय लागवडीखालील पेरणी झालेल्या क्षेत्राचा व या पिकांचे वार्षिक सरासरी उत्पादन आणि उंबरठा उत्पन्न (प्रति हेक्टरी उत्पादकता) विचारात घेऊन पिक विमा नुकसान भरपाई देण्यात येते.

सबब, सदरची योजना प्रभावीपणे व पारदर्शकरित्या अंमलात आणण्यासाठी आधुनिक तंत्रज्ञानाचा जास्तीत जास्त वापर करून विशेषत: Satellite Imaging व Drone Technology च्या सहाय्याने राज्यातील पिकनिहाय क्षेत्र अचूकपणे परिगणित करणे व लागवड केलेल्या पिकांचे आरोग्याचे सर्वेक्षण नियमित स्वरूपात करून संबंधित पिकांचे काढणी पश्चात येणारे उत्पादनाचे अनुमान ( yield estimate) काढण्यासाठी प्रकल्प हाती घेण्याचे प्रस्तावित होते.

या संदर्भात प्रधानमंत्री पिक विमा योजनेच्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांमधील सूचना क्र.२.१४,१४.१ व २०.३.२ नुसार वरील प्रमाणे राज्याने प्रकल्प हाती घेण्याबाबत व सदर प्रयोजनार्थ येणारा खर्च हा या योजनेकरीता प्रशासकीय बाबींसाठी निर्धारीत केलेल्या २% निधीतून करण्यास केंद्र शासनाने मान्यता दिलेली आहे.

या अनुषंगाने विभागाच्या ई-गव्हर्नन्स विषयक प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत महाराष्ट्र सुदूर संवेदन उपाययोजना केंद्र, नागपूर (MRSAC) या राज्यशासन अंगीकृत स्वायत्त संस्थेने सादर केलेल्या प्रस्तावास दि.५/११/२०१८ च्या बैठकीत मान्यता दिली आहे. यानुसार राज्यातील ६ जिल्हे व त्याशिवाय ६ तालुक्यांमध्ये पहिल्या टप्प्यात सदर प्रकल्प कार्यान्वित करण्याकरीता निधी उपलब्ध करून देण्याबाबत MRSAC ने सादर केलेल्या प्रस्तावानुसार रू.२.४२ कोटी इतक्या निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

१. प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि ५.११.२०१८.रोजीच्या बैठकीत महाराष्ट्र सुदूर संवेदन उपाययोजना केंद्र,नागपूर (MRSAC) यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार रब्बी हंगामात महाराष्ट्रातील खालील सहा जिल्हयात व त्याशिवाय अतिरीक्त सहा तालुक्यांत प्रथम टप्प्यात उपग्रह व ड्रोन तंत्रज्ञानाचा वापर करुन विशेषत: पिक पेरणी, पिकांचे आरोग्य व पिकांचे उत्पादन यासंदर्भात प्रणाली विकसित करण्यासाठी मान्यता देण्यात येत आहे. तसेच प्रधानमंत्री पिक विमा योजनेच्या सुधारीत मार्गदर्शक सूचना क्र १४.१ ,२०.३.२ ,२.१४ .नुसार प्रशासकिय बाबींकरीता निर्धारीत करण्यात आलेल्या २% निधीतुन सदर प्रकल्पाकरीता येणारा खर्च भागविण्यासाठी रू.२४२.१८ लक्ष इतका निधी उपलब्ध करून देण्यास व सदरचा निधी वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरच्या पहिल्या टप्प्यात खालील ६ जिल्हयामध्ये व ६ तालुक्यांमध्ये संबंधित पिकांकरीता रब्बी हंगाम २०१८ मध्ये सदरचा प्रकल्प कार्यान्वित करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | तालुके |
|---|---|---|---|
| १. | पुणे | सोलापूर | मंगळवेढा |
| २. | नाशिक | जळगाव | जळगाव |
| ३. | औरंगाबाद | लातूर | रेणापूर |
| ४. | औरंगाबाद | बीड | आंबेजोगाई |
| ५. | अमरावती | बुलढाणा | बुलढाणा |
| ६. | नागपूर | नागपूर | मौदा |

३. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा (००) (०८) प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत विमा हप्त्यासाठी अर्थसहाय्य राज्य हिस्सा (२४०१ A ६६४) योजनेतर**

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर कृषि संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११६१६३५०७७४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
Date: 2018.11.16 18:08:37 +05'30'

(अ.वि.जोशी)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव माहिती व तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई-३२
२. संचालक , महाराष्ट्र सुदुर संवेदन उपयोजन केंद्र, पुणे
३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
६. उप सचिव (११-अे/२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
७. कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
८. निवड नस्ती (कार्यासन ११अे-)